तहसिलदार, अंबरनाथ यांना त्यांच्या जुन्या निर्लेखित वाहनांच्या बदली नवीन वाहने खरेदी करण्यास मंजुरी देणेबाबत..

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

## शासन निर्णय क्रमांकः वाहने-२०२२/प्र.क्र.९९/ई-८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०५ एप्रिल, २०२३.

**संदर्भ:-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. जेपीएस-२०१४/प्र.क्र.११/ई-८, दि. ०२/१२/२०१७

२)शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-वाहन-२०१७/प्र.क्र.४१/१७/विनियम, दि.२८/०७/२०२०.

३) विभागीय आयुक्त, कोकण यांचे पत्र क्र.साशा /कार्या-रकाप/ नविनवाहन/ तह.अंबरनाथ/ २२-२३ दि. ०९/०६/२०२२.

**प्रस्तावना:-**

कोंकण महसूल विभागातील लेखाशिर्ष “२०५३- जिल्हा प्रशासन” या खाली वेतन आहरित करणाऱ्या ९७ क्षेत्रीय अधिकाऱ्यांना शासकीय वाहनांची अनुज्ञेयता संदर्भाधीन दि.०२/१२/२०१७ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आली आहे. विभागीय आयुक्त, कोकण यांनी त्यांच्या संदर्भाधिन दि.०९/०६/२०२२ च्या पत्रान्वये त्यांच्याकरिता निर्लेखित केलेल्या वाहनांच्या बदली नवीन वाहन खरेदीस मंजूरी देण्यासाठीचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

कोकण महसूली विभागातील तहसिलदार, अंबरनाथ यांना त्यांच्या पूर्वीच्या जुन्या निर्लेखित वाहन क्र. एम एच-०४-एएन-३४४८ च्या बदली नवीन वाहने खरेदी करण्यास व तदप्रित्यर्थ येणाऱ्या रुपये ८.०० लाख (अक्षरी रुपये आठ लाख फक्त) च्या खर्चास खालील अटींच्या अधिन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.-

१. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-वाहन-२०१७/प्र.क्र.४१/१७/विनियम, दिनांक २८/०७/२०२० च्या शासन निर्णयामधील तरतुदीनुसार तहसिलदार,

अंबरनाथ, यांना रुपये ८.०० लाखाच्या कमाल मर्यादेत (वाहनाची किंमत + वस्तू व सेवा कर + टेम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस + मूल्यवर्धित कर + सहाय्यभूत साहित्य (Accessories) इत्यादी अंतर्भूत करुन) वाहन खरेदी करण्यात यावी.

२. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि. ०१/१२/२०१६ व क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र. २१५/उद्योग-४, दि. २४/०८/२०१७ च्या शासन निर्णयानुसार वाहन खरेदी GeM Portal वरुन विहित पध्दतीचा अवलंब करुन करण्यात यावी.

२. सदर प्रस्तावातील खर्च लेखाशिर्ष "मागणी क्र. सी-१० २०५३ जिल्हा प्रशासन (००)०९४-जिल्हा आस्थपना (०१)सर्वसाधारण आस्थपना (०१) (०१) आयुक्त कोकण (२०५३ ००२८) अंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता उपलब्ध करून दिलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५९/२०२३/विनियम, दिनांक १६/०२/२०२३ व अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३२२/२०२३/व्यय-९, दि.२९/०९/२०२३ अन्वये त्या विभागाने दिलेल्या संमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०४०६१३२२२६५८१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dr.SHWETA SAWDEKAR BAIG

Digitally signed by Dr.SHWETA SAWDEKAR BAIG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6281ac1913ceb1456ffcfd8e5d3dbe032cfa746426763d6351cb898b72986801, pseudonym=7EEE8BAF53B2BFC59945DABFC99C96C2C2709F7F, serialNumber=2FA86D3D30D0DE896CC35E8F420B067861B1ECA1D14FF010A5202C61E6ADC6FE, cn=Dr.SHWETA SAWDEKAR BAIG
Date: 2023.04.06 17:09:55 +05'30'

**(डॉ.श्वेता सावदेकर-बेग)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण.

२. जिल्हाधिकारी, ठाणे.
३. तहसिलदार, अंबरनाथ, जि.ठाणे
४. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा) -१, महाराष्ट्र, मुंबई .
५. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे
६. सह सचिव/उप सचिव, वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/विनियम), मंत्रालय, मुंबई-३२.
७. निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.